**भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम, १९८८ अंतर्गत अभियोग मंजुरी आदेशावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांसाठी मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अभियो-१६२१/प्र.क्र.५४/११-अ**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २७ जानेवारी, २०२२

<u>वाचा</u> :- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक विचौअ-१६१९/प्र.क्र.४०/११-अ, दि. १४ जानेवारी, २०२१.

**<u>प्रस्तावना :-</u>**

भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम, १९८८ अंतर्गत अभियोगास मंजुरी देण्याच्या प्रकरणावर जाणीवपूर्वक निर्णय घेऊन, मंजुरी आदेशावर किमान उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास स्वाक्षरी करण्यासाठी प्राधिकृत करण्याबाबतच्या सूचना वरील संदर्भाधीन दि.१४ जानेवारी, २०२१ च्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत. मंजुरी आदेशावर स्वाक्षरी करणाऱ्या अधिकाऱ्यांना, सदर मंजुरी आदेशाच्या अनुषंगाने न्यायालयात साक्षीसाठी उपस्थित रहावे लागते. तथापि, साक्षीदरम्यान आरोपी लोकसेवकाच्या वकिलांकडून घेण्यात येणाऱ्या उलट तपासणीमध्ये या अधिकाऱ्यांकडून योग्य उत्तरे दिली जात नाहीत, असे निदर्शनास आले आहे.

साक्षीदरम्यान, मंजुरी आदेशावर स्वाक्षरी करणाऱ्या अधिकाऱ्यास, तो सदर प्रकरणी संबंधित आरोपी लोकसेवकास सेवेतून काढून टाकण्यास/अभियोगास मंजुरी देण्यास सक्षम आहे किंवा कसे याबाबत विचारणा केली जाते. तेव्हा, सदर प्रकरणी सक्षम प्राधिकाऱ्याने मूळ नस्तीवर त्याच्या स्वाक्षरीने अभियोग दाखल करण्यास मंजुरी दिली आहे, सदर सक्षम प्राधिकारी त्या लोकसेवकास सेवेतून काढू टाकू शकतो आणि सक्षम प्राधिकाऱ्याने मंजुरी आदेशावर स्वाक्षरी करण्यास मला प्राधिकृत केले असून त्याच्या वतीने मी साक्ष देत आहे, असा खुलासा मंजुरी आदेशावर स्वाक्षरी करणाऱ्या अधिकाऱ्याने करणे आवश्यक आहे. त्यासाठी संबंधित शासकीय अभियोक्त्याने तपासणी/आवश्यकतेनुसार फेरतपासणी (Re-examination) देखील घेणे आवश्यक आहे. तथापि, अशी कार्यवाही केली जात नसल्याने न्यायालयाकडून सदरचा मंजुरी आदेश अवैध (Invalid) ठरविला जातो आणि आरोपीस निर्दोष सोडले जाते किंवा विनादोषारोप सुटका (Discharge) केली जाते, असे आढळून आले आहे.

न्यायालयात उचित पद्धतीने साक्ष दिली न गेल्यास अभियोगास देण्यात आलेली मंजुरी अवैध ठरवून आरोपीस निर्दोष सोडले जाते किंवा विनादोषारोप सुटका केली जाते, ही बाब विचारात घेऊन मंजुरी आदेशावर स्वाक्षरी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी याबाबत घ्यावयाच्या दक्षतेबाबत सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन आता पुढीलप्रमाणे सूचना देत आहे:

**परिपत्रक-**

**(अ)** अभियोगास मंजुरी देण्याच्या आदेशावर स्वाक्षरी करणाऱ्या अधिकाऱ्याने मंजुरी आदेशाबाबत साक्ष देण्यापूर्वी खालील कागदपत्रांचा अभ्यास करावा :

१. लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून प्राप्त झालेल्या मंजुरीबाबतचा प्रस्ताव,

२. प्रस्तावासोबतची तपासाची सर्व कागदपत्रे,

३. सदर प्रस्तावाची नस्ती ज्या अधिकाऱ्यांमार्फत सक्षम प्राधिकाऱ्यास निर्णयासाठी सादर करण्यात आली, त्या अधिकाऱ्यांनी दिलेले अभिप्राय /शेरे,

४. विधी व न्याय विभागाचे / विधी अधिकाऱ्याचे अभिप्राय,

५. आरोपी लोकसेवकाच्या प्रकरणी मंजुरी आदेश देणारे सक्षम प्राधिकारी कोण आहेत त्याबाबतचे शासनाचे सर्वसाधारण आदेश, मंजुरीच्या मूळ कागदपत्रांवर स्वाक्षरी करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याचे नाव व पदनाम, मंजुरी आदेशावर स्वाक्षरी करण्यास सक्षम प्राधिकाऱ्याने प्राधिकृत केल्याबाबतची टिप्पणी.

**(ब)** वरीलप्रमाणे सर्व टिप्पण्यांच्या प्रमाणित प्रती, मंजुरीबाबतची मूळ नस्ती व संबंधित आदेश साक्षीस जाताना सोबत ठेवावेत.

**(क)** प्रत्यक्ष साक्षीपूर्वी संबंधित शासकीय अभियोक्ता यांनी साक्षीदाराची पूर्ण तयारी करुन घ्यावी. तसेच, सुनावणीदरम्यान तपासणी/आवश्यकतेनुसार फेरतपासणी देखील घ्यावी. याबाबत गृह विभागाने सर्व संबंधित शासकीय अभियोक्त्यांना सूचना द्याव्यात.

२. सर्व प्रशासकीय विभागांनी / क्षेत्रिय कार्यालयांनी अभियोगास मंजुरी देण्याच्या आदेशांवर स्वाक्षरी करण्यासाठी विवक्षित अधिकाऱ्यास प्राधिकृत करण्याचे आदेश निर्गमित करताना या परिपत्रकातील सूचना त्याच्या निदर्शनास आणण्याची खबरदारी घ्यावी.

३. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०१२७१३४९३४२७०७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT SAJANIKAR

Digitally signed by PRASHANT SAJANIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=471c7cbe63d119adc5855a3c23ed95de986c1c7bc41d6f6cdd3767b3ebe74c82, pseudonym=19939F8B3C9B8C6C56014628463D708305EA65C7, serialNumber=217003E42C820EC29C89162937F98929453CC6295B34F71EA285041053A66AA7, cn=PRASHANT SAJANIKAR
Date: 2022.01.27 13:51:48 +05'30'

**( प्रशांत साजणीकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
४. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव,
५. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव,
६. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव,
७. उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव,
८. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव,
९. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव,
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
११. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव,
१३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
१४.* महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१५.* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
१६.* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
१७.* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१८.* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१९.* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
२०.* आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई
२१.* महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
२२. सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी, सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
२३. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख,
२४. सर्व विधीमंडळ सदस्य,
२५. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२६. निवडनस्ती (११अ).